जिल्हा व सत्र न्यायालय भंडारा व साकोली, लाखांदूर, पवनी, मोहाडी आणि तुमसर या न्यायालयीन इमारतींमध्ये अग्नीशमन यंत्रणा उभारणी / अग्नीप्रतिबंधक उपाययोजना करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देणेबाबत. .

# महाराष्ट्र शासन

## विधि व न्याय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण १५१७/प्र.क्र.१५१/का.१२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: १५ ऑक्टोबर, २०१८

**वाचा -**

१ उप प्रबंधक B(W) शाखा, मा.उच्च न्यायालय मुंबई यांचे पत्र क्रमांक B(W) /६०५४ of १९८६, दिनांक २०.०६.२०१६

२ संचालक, महाराष्ट्र अग्नीशमन सेवा संचालनालय यांचे पत्र क्रमांक मअसे / २०१७/३७/१०५, दिनांक १८.०१.२०१७

**प्रस्तावना -**

मा.उच्च न्यायालय मुंबई येथे दाखल जनहित याचिका क्रमांक २१६/२०१० मध्ये मा.उच्च न्यायालय मुंबई यांनी दिलेल्या आदेशांस अनुलक्षून राज्यातील सर्व न्यायालयीन इमारतींचे फायर ऑडीट करण्यात येत असून अग्नीशमन यंत्रणा उभारणी / अग्नीप्रतिबंधक उपाययोजना करण्यात येत आहेत. त्या अनुषंगाने दिनांक २०.०६.२०१६ रोजीच्या पत्रान्वये उप प्रबंधक, मा.उच्च न्यायालय मुंबई यांनी जिल्हा व सत्र न्यायालय भंडारा व साकोली, लाखांदूर, पवनी, मोहाडी आणि तुमसर येथील न्यायालयीन इमारतींमध्ये अग्नीशमन यंत्रणा उभारणी / अग्नीप्रतिबंधक उपाययोजना राबविण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. महाराष्ट्र अग्नीशमन सेवेचे संबंधित अधिकारी यांनी सदर प्रस्तावात नमूद अग्नीप्रतिबंधक उपाययोजना सुचविल्या असून त्यांनी दिलेल्या शिफारशींनुसार न्यायालयीन इमारतींत अग्नीशमन यंत्रणा बसविण्याची कामे करण्यासाठी संचालक, महाराष्ट्र अग्नीशमन सेवा संचालनालय यांनी सहमती दर्शविली आहे. स्थानिक अग्नीशमन अधिका-यांनी सुचित केलेल्या उपाययोजनांच्या अनुषंगाने सन २०१७-१८ च्या दरसूचीवरील अंदाजपत्रके सार्वजनिक बांधकाम विभागाचे संबंधित उप अभियंता यांनी तयार केली असून संबंधित कार्यकारी अभियंता यांनी साक्षांकीत केली आहेत. त्या अनुषंगाने जिल्हा व सत्र न्यायालय भंडारा व साकोली, लाखांदूर, पवनी, मोहाडी आणि तुमसर येथील न्यायालयीन इमारतींमध्ये अग्नीशमन यंत्रणा उभारणी / अग्नीप्रतिबंधक उपाययोजना राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

जिल्हा व सत्र न्यायालय भंडारा व त्यांचे नियंत्रणाखालील न्यायालयांमध्ये अग्नीशमन यंत्रणा उभारणी / अग्नीप्रतिबंधक उपाययोजना राबविण्यासाठी मा.उच्च न्यायालय मुंबई यांचेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावांच्या अनुषंगाने जिल्हा व सत्र न्यायालय भंडारा व साकोली, लाखांदूर, पवनी, मोहाडी

व तुमसर येथील न्यायालयीन इमारतींमध्ये अग्नीशमन यंत्रणा उभारणी / अग्नीप्रतिबंधक उपाययोजना राबविण्यासाठी अंदाजपत्रकातील संगणकीकरणाची तरतुद वगळून, ४% आकस्मिक खर्च व१२% वस्तु व सेवा कराकरीता तरतुद करुन रुपये १,२८,४८,७७८/- (रुपये एक कोटी अठ्ठावीस लक्ष अठ्ठेचाळीस हजार सातशे अठ्ठयाहत्तर फक्त) इतक्या खर्चाच्या कामांस प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. न्यायालयीन इमारतींचा तपशील खालीलप्रमाणे आहे :

| अ.क्र. | न्यायालयीन इमारत | कामाचा अंदाजित खर्च |
|---|---|---|
| १ | जुनी इमारत, जिल्हा व सत्र न्यायालय भंडारा | ३,४४,७०६ |
| २ | नवीन इमारत, जिल्हा व सत्र न्यायालय भंडारा | ५,३७,१९८ |
| ३ | दिवाणी व फौजदारी न्यायालय भंडारा | २,८५,११५ |
| ४ | पवनी | २५,८६,०६६ |
| ५ | मोहाडी | २६,५९,७८७ |
| ६ | तुमसर | १२,१९,१५७ |
| ७ | लाखांदूर | २६,३४,२४५ |
| ८ | साकोली | २५,८२,५०४ |
| | एकूण<br>अक्षरी रुपये एक कोटी अठ्ठावीस लक्ष अठ्ठेचाळीस हजार सातशे अठ्ठयाहत्तर फक्त | १,२८,४८,७७८ |

२. जिल्हा व सत्र न्यायालय भंडारा व साकोली, लाखांदूर, पवनी, मोहाडी व तुमसर या न्यायालयीन इमारतींमध्ये अग्नीशमन यंत्रणा उभारणी /अग्नीप्रतिबंधक उपाययोजना राबविण्यासाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक जे-१, २०१४ -न्यायदान, (००) १०५ - दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) जिल्हा व सत्र न्यायाधिश -(०२)(०१) जिल्हा व सत्र न्यायाधिश , (२०१४ ०१७२) दत्तमत, २७ लहान बांधकामे" या लेखाशीर्षाखालील अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सदर कामाची निविदा मागविण्यापूर्वी स्थानिक अग्नीशमन अधिकारी यांनी निश्चित केलेल्या उपाययोजनांमधीलच कामे असल्याची खातरजमा करण्याची जबाबदारी प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश भंडारा यांची राहील. प्रचलित कार्यपद्धतीचा अवलंब करुन ई-निविदा प्रक्रीया सार्वजनिक बांधकाम विभागाकडून राबविण्यात यावी व या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करावी. स्थानिक अग्नीशमन अधिकारी यांनी सुचविलेल्या उपाययोजनांचे अनुपालन होईल यांबाबत प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश भंडारा यांनी दक्षता घ्यावी.

४. हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २८२/२०१८/इमा-२, दिनांक १५.०३.२०१८ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने तसेच, शासन निर्णय वित्त विभाग दिनांक १७.०४.२०१५ वित्तिय अधिकार नियमपुस्तिका भाग पहिला उप विभाग ३, अ.क्र. ४,

परि.२७(२) (अ) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१५१५२२३५४६१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhagyashree Rajendra Bhaidkar

Digitally signed by Bhagyashree Rajendra Bhaidkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d567849462918ceb7579bb2b56247e927c039bbdf028022a8b9ce837a7c854bb, serialNumber=fb84fefefe4ee219c1bc35b35201c14eab0903e8194a7413a74eed93f32afdb0, cn=Bhagyashree Rajendra Bhaidkar
Date: 2018.10.15 15:25:54 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. प्रबंधक (निरीक्षणे १), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
२. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधिश, भंडारा,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता १ / २), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
४. महालेखापाल (लेखा परीक्षा १ /२), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर,
५. संचालक, महाराष्ट्र अग्नीशमन सेवा संचालनालय, महाराष्ट्र अग्नीशमन सेवा अकादमी, विद्यानगरी, हंस भुंग्रा मार्ग, सांताक्रूझ, मुंबई ४०० ०९८.
६. जिल्हा कोषागार अधिकारी भंडारा,
७. उप जिल्हा कोषागार अधिकारी भंडारा,
८. वित्त विभाग (व्यय-५), सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), नगर विकास विभाग (नवि-२०), मंत्रालय,
९. विधि व न्याय विभाग (का.१३, २३), मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती (का.१२)